केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण विभागाच्या " साथीचे आजार आणि नैसर्गिक आपत्ती यांचे व्यवस्थापन करण्यासाठी प्रयोगशाळेचे जाळे स्थापित करणेबाबत" या योजनेअंतर्गत विषाणू संशोधन व निदान प्रयोगशाळा (व्हायरल रिसर्च ॲण्ड डायग्नोस्टीक लॅबोरेटरी (व्हीआरडीएल)) राज्यस्तर प्रयोगशाळा व वैद्यकीय महाविद्यालयीन स्तर प्रयोगशाळा स्थापन करणे

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : व्हीडीएल- २०१८/प्र.क्र.२८४/प्रशा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,
दिनांक : १५ ऑक्टोबर, २०१८.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण विभागाच्या अंतर्गत निर्मित करण्यात आलेला आरोग्य संशोधन विभाग, भारतीय वैद्यकीय संशोधन परिषद आणि आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय यांच्या विद्यमान धोरणानुसार १२ व्या पंचवार्षिक योजनेअंतर्गत "साथीचे आजार आणि नैसर्गिक आपत्ती यांचे व्यवस्थापन करण्यासाठी प्रयोगशाळेचे जाळे स्थापित करणेबाबत" (Establishment of Network of laboratories for managing Epidemic and Natural calamities for implementation) योजनेअंतर्गत राज्यात विभागीय स्तर, राज्यस्तरीय, वैद्यकीय महाविद्यालयीन स्तर विषाणू संशोधन व निदान प्रयोगशाळा (व्हायरल रिसर्च ॲण्ड डायग्नोस्टीक लॅबोरेटरी (व्हीआरडीएल)) स्थापन करण्याबाबत प्रस्तावित आहे. त्यानुसार सदर योजनेच्या अनुषंगाने विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालयांमध्ये विषाणू संशोधन व निदान राज्यस्तर प्रयोगशाळा व वैद्यकीय महाविद्यालय स्तर प्रयोगशाळा स्थापन करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाने निश्चित केलेल्या धोरणानुसार महाराष्ट्र राज्यात राज्यस्तर व वैद्यकीय महाविद्यालय स्तर प्रयोगशाळा विषाणू संशोधन व निदान प्रयोगशाळा (व्हायरल रिसर्च ॲण्ड डायग्नोस्टीक लॅबोरेटरी (व्हीआरडीएल)) स्थापन करण्यास खालीलप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) केंद्र शासनाच्या आरोग्य व कुटुंब कल्याण विभागाच्या अंतर्गत निर्मित करण्यात आलेला आरोग्य संशोधन विभाग तसेच भारतीय वैद्यकीय संशोधन परिषद आणि आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय यांच्या विद्यमान धोरणानुसार १२ व्या पंचवार्षिक योजनेअंतर्गत "साथीचे आजार आणि नैसर्गिक आपत्ती यांचे व्यवस्थापन करण्यासाठी प्रयोगशाळेचे जाळे स्थापित करणेबाबत" (Establishment of Network of laboratories for managing Epidemic and Natural calamities for implementation) योजनेनुसार शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर येथे विषाणू संशोधन व निदान प्रयोगशाळा (व्हायरल रिसर्च ॲण्ड डायग्नोस्टीक लॅबोरेटरी (व्हीआरडीएल)) राज्यस्तर प्रयोगशाळा उभारणीस व त्यानुषंगाने सामंजस्य करार करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२) उपरोक्त केंद्र शासनाच्या योजनेअंतर्गत विभागाच्या नियंत्रणाखालील औरंगाबाद, अकोला, धुळे व सोलापूर येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयात, विषाणू संशोधन व निदान प्रयोगशाळा (व्हायरल रिसर्च ॲण्ड डायग्नोस्टीक लॅबोरेटरी (व्हीआरडीएल)) वैद्यकीय महाविद्यालय स्तर प्रयोगशाळा स्थापन करण्यास व त्यानुषंगाने सामंजस्य करार करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३) सदर योजने अंतर्गत राज्यस्तर तसेच वैद्यकीय महाविद्यालय स्तरावर स्थापन करण्यात येणाऱ्या विषाणू संशोधन व निदान प्रयोगशाळा (व्हायरल रिसर्च ॲण्ड डायग्नोस्टीक लॅबोरेटरी (व्हीआरडीएल)) प्रयोगशाळेंच्या अनुषंगाने पाच वर्षानंतर राज्य शासनास येणाऱ्या आवर्ती खर्चाच्या दायित्वास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४) सदर विषयी केंद्र शासनाच्या उपरोक्त योजनेंतर्गत भविष्यात अन्य शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयात विभागीय स्तर प्रयोगशाळा, राज्यस्तर प्रयोगशाळा किंवा वैद्यकीय महाविद्यालय स्तर प्रयोगशाळा उभारण्यास केंद्र शासनाची मान्यता वा सहमती प्राप्त झाल्यास त्याबाबत नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने निर्णय घेण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५) सदर विषयी राज्य शासनाच्यावतीने सामंजस्य करार करण्यास संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांना प्राधिकृत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत विषयी संबंधित राज्यस्तर व वैद्यकीय महाविद्यालय स्तर विषाणू संशोधन व निदान प्रयोगशाळांसाठी (व्हायरल रिसर्च ॲण्ड डायग्नोस्टीक लॅबोरेटरी (व्हीआरडीएल)) केंद्र शासनामार्फत प्रत्यक्षात निधी उपलब्ध झाल्यानंतर सदर प्रयोगशाळा कार्यान्वित होतील.

३. सदर योजना कार्यान्वित झाल्यावर ५ वर्षानंतर या योजनेवर झालेल्या खर्चाचे मूल्यमापन करण्यासाठी संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात यावी.

४. प्रस्तुत विषयी उपरोक्त मान्यतेच्या अनुषंगाने राज्यस्तर व वैद्यकीय महाविद्यालयीन स्तरावर स्थापन करण्यात येणाऱ्या विषाणू संशोधन व निदान प्रयोगशाळांसाठी (व्हायरल रिसर्च ॲण्ड डायग्नोस्टीक लॅबोरेटरी (व्हीआरडीएल)) च्या अनुषंगाने केंद्र शासनास उचित प्रस्तावासह सामंजस्य कराराचा मसुदा पाठविण्यास व त्यानुषंगाने आवश्यक तो पाठपुरावा करण्यास संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१५१७१९३६०९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.10.15 17:29:28 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
९) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१०) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
११) सर्व मंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) सर्व राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१४) मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
१५) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१७) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१८) सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय/आयुर्वेद/दंत महाविद्यालये व रुग्णालये,
१९) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक, शासकीय रुग्णालये, महाराष्ट्र राज्य.
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२३) निवड नस्ती (प्रशा-१)